कुं येरवडा मध्यवर्ती कारागृह येथे एक कारखाना शेड बांधण्याबाबत..

महाराष्ट्र शासन.
गृह विभाग.

शासन निर्णय क्र. बीएलडी-१०९५/६/१६/पीआरएस-२,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२. दिनांक- २९ नोव्हेंबर १९९५.

वाचा :- कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे क्रमांक- कारखाना/योजना/२३-२७, क-६[१] दिनांक ५.८.१९९५चे पत्र.

शासन निर्णय :- कुं. येरवडा मध्यवर्ती कारागृह पुणे येथे औद्योगिक विभागाचे आधुनिकीकरण करणेसाठी एक कारखाना शेड बांधण्याच्या रुपये ९,३०,२१७/- [रु. नऊ लाख तीस हजार दोनशे सत्याण्णव ]इतक्या अंदाजपत्रक व नकाशे यांना खालील अटींवर/ आदेशाद्वारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१] अर्थसंकल्पात तरतूद केल्याशिवाय प्र त्यक्ष कामास सुरुवात करु नये.

२] यापूर्वी प्रशासकीय मान्यता दिलेली कामे प्राधान्याने हाती घेऊन नंतरच प्रस्तावाधीन काम हाती घ्यावे.

३] काम चालू आर्थिक वर्षी हाती घ्यावयाचे असल्यास १९९५-९६ मध्ये "सामान्य सेवा" या उपशीर्षाखाली वार्षिक योजना १९९५-९६ मध्ये असलेल्या तरतुदीच्या अधीन राहून प्रस्तुतचा खर्च भागवावा.

२. प्रस्तावीत बांधकामावरील खर्च" ~~४०५९~~ ४०५९-सार्वजनिक बांधकामवरील भांडवली खर्च-०१ कार्यालयीन इमारती १०१ बांधकामे ~~मुख्य~~ पंचवार्षिक योजनांतर्गत "योजना" मुख्य या शिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. हा आदेश प्रशासकीय विभाग प्रमुखांना शासन निर्णय, वित्त विभाग क्र. विअप्र-१०९२/प्र.क्र. ११३/९२ विनियम दि. १.६.१९९२ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या शक्तींचा वापर करुन सार्वजनिक बांधकाम विभाग/नियोजन विभाग व वित्त विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

[स्वाक्षरी]

[एस. एस. इनामदार ]
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१] कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे.

२] कारागृह उप-महानिरीक्षक [मुख्यालय]महाराष्ट्रराज्य, पुणे.

३] अधिक्षक येरवडा मध्यवर्ती कारागृह पुणे.

४] महालेखापाल-महाराष्ट्र-१, [लेखा व अनुज्ञेयता] मुंबई.

५] महालेखापाल महाराष्ट्र-१, [लेखा परीक्षा] मुंबई.

६] अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

७] निवासी लेखा अधिकारी, मुंबई.

८] सार्वजनिक बांधकाम विभाग, इमारत-२ अर्थ -२,

९] नियोजन विभाग/योजना-१०

१०] वित्त विभाग/व्यय-८

११] निवड नस्ती.